वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ (भाग-दोन) नुसार वित्त विभागाच्या अधिपत्याखालील, वस्तू व सेवाकर विभागासाठी वाहने भाडेतत्त्वावर घेण्यास व त्यासाठीच्या खर्चास मंजुरी देण्याचे वित्तीय अधिकार प्रदान करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्र.: संकीर्ण-१०१८/प्र.क्र.११९/२०१८/वि.प्र.-४**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: १२ डिसेंबर, २०१८

**संदर्भ:** राज्यकर आयुक्त यांचे पत्र क्र.:राउआ (ज.सं.)/आस्था-१४/वाहने/ वित्तीय अधिकार/२०१८-१९/ब-५७२, दिनांक ०५ जून, २०१८.

**प्रस्तावना:**

वित्त विभागाच्या अधिपत्याखालील, वस्तू व सेवा कर विभागासाठीचा वाहन आढावा घेण्यात आला असून आढाव्यात मंजूर झालेल्या वाहनसंख्येच्या मर्यादेत काही वाहने भाडेतत्वावर घेण्यात येतात. अशा प्रकारे वाहने भाड्याने उपलब्ध करुन घेताना शासन स्तरावरून राज्यस्तरीय वाहन आढावा समितीची मान्यता घ्यावी लागते. वस्तू व सेवाकर विभागाचे कामकाजाचे स्वरूप पहाता वाहनांची नेहमीच आवश्यकता भासत असून करार पद्धतीने भाडेतत्त्वावर वाहने उपलब्ध करुन घेण्यास व त्यासाठीच्या खर्चास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ तसेच महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम,१९६५ अंतर्गत वित्तीय अधिकार प्रदान करण्यात आलेले नाहीत. त्यामुळे राज्यकर आयुक्त, वस्तू व सेवा कर विभाग यांना वस्तू व सेवा कर विभागासाठी करार पद्धतीने भाडेतत्त्वावर घेण्यात येणाऱ्या वाहनांच्या भाडेखर्चास मंजूरी देण्याचे अधिकार प्रदान करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

वित्त विभागाच्या अधिपत्याखालील वस्तू व सेवाकर विभागासाठी वाहन आढाव्यात मंजूर झालेल्या वाहन संख्येच्या मर्यादेत करार पध्दतीने वाहने भाडेतत्त्वावर घेण्यास व त्यासाठीच्या खर्चास मंजूरीसाठी राज्यकर आयुक्त, वस्तू व सेवा कर विभाग यांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-दोन अंतर्गत सोबतच्या परिशिष्टात नमूद केल्यानुसार वित्तीय अधिकार प्रदान करण्यास याद्वारे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

प्रस्तुत शासन निर्णय, वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.४५५/२०१८/व्यय-२, दि.२७.०८.२०१८ व क्र. ४९४/२०१८/विनियम, दिनांक १८.०९.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२१२१५३५२९५८०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Zamir Ahmed Shaikh

Digitally signed by Zamir Ahmed Shaikh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bd9b39db1f8efa7024db820b12b577501aa63b328fc3faed8b55bdbb9c7a9f99, serialNumber=7599780b79479031238fd885feb6d3048c179e75bb21592fd3d953602cd5d8fa, cn=Zamir Ahmed Shaikh
Date: 2018.12.12 15:46:21 +05'30'

**( ज.अ.शेख )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) राज्यकर आयुक्त, वस्तू व सेवा कर विभाग, वस्तू व सेवा कर भवन, माझगाव, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा)-१/२, महाराष्ट्र , मुंबई/नागपूर,
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
६) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
७) वित्त विभाग (विनियम,व्यय-२/प्रशा-४), मंत्रालय, मुंबई,
८) निवड नस्ती, वि.प्र.-४ कार्यासन, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

## परिशिष्ट

**शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण-१०१८/प्र.क्र.११९/२०१८/वि.प्र.-४, दि.१२ डिसेंबर, २०१८**

| अ.क्र. | वित्तीय शक्तीचे वर्णन | अधिकाराचा वापर करण्यास सक्षम अधिकारी | प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारांची मर्यादा | अटी |
|---|---|---|---|---|
| (१) | (२) | (३) | (४) | (५) |
| १. | वस्तू व सेवाकर विभागासाठी करार पद्धतीने भाडेतत्त्वावर वाहने घेण्यास व खर्चास मंजूरी देणे. | राज्यकर आयुक्त | पूर्ण अधिकार | १. खर्च मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.<br><br>२. वित्त विभाग, शासन निर्णय दि.२१.१.२०१७ व त्यात वेळोवेळी होणाऱ्या सुधारणांनुसार ज्या अधिकाऱ्यास / कार्यालयास ज्या किंमत मर्यादेतील वाहन अनुज्ञेय करण्यात आले आहे त्या किंमत मर्यादेपेक्षा अधिक किंमतीचे वाहन भाडयाने घेता येणार नाही.<br><br>३. करार पद्धतीने घेण्यात येणारी वाहने कार्यालयीन निकडीच्या कामासाठी स्टाफ कार म्हणून अथवा अनुज्ञेय अधिका-यांसाठी अभिहस्तांकित वाहन म्हणून वापरासाठी असावेत.<br><br>४. करार पद्धतीने वाहन पुरवठा करण्यासाठी पुरवठादाराची निवड आवश्यकतेनुसार उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.भांखस-२०१४/प्र.क्र.८२,भाग-III/उद्योग-४,दि.१.१२.२०१६ मधील तरतूदीनुसार तसेच शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/ उद्योग-४, दि.२४.८.२०१७ च्या सुधारणेनुसार ई-निविदा प्रक्रियेद्वारे अथवा गव्हर्मेंट ई- मार्केट प्लेस (GeM) प्रणालीद्वारे करण्यात यावी.<br><br>५. वित्त विभाग, शासन निर्णय क्र.वाहन-१०००/प्र.क्र.६५/२००१/विनियम, दि.१०.९.२००१ मधील तरतूदीनुसार संबंधित जिल्हयासाठी आवश्यकतेनुसार वाहन पुरवठादारांची नामिका (Empanelled List) व दर करार राज्यस्तरीय वाहन आढावा समितीद्वारे करण्यात आलेले असल्यास, करार पद्धतीने वाहन पुरवठयासाठी निवडण्यात येणा-या सेवा पुरवठादाराचे दर हे राज्यस्तरीय वाहन आढावा समितीने निश्चित केलेल्या दर कराराहून अधिक नसावेत.<br><br>६. करार पद्धतीने वाहने भाडेतत्वावर घेण्यासाठी निवडण्यात येणा-या सेवापुरवठादाराचे दर वित्त विभाग, शासन निर्णय दि.१०.९.२००१ मध्ये नमूद समितीने निश्चित केलेल्या दरकरार दराहून कमी राहतील व खर्चात बचत होईल याबाबतची दक्षता राज्यकर आयुक्त, वस्तु व सेवा कर विभाग यांची असेल.<br><br>७. सदर खर्च कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली त्या त्या वित्तीय वर्षात उपलब्ध अनुदानातून भागविण्यात येईल.<br><br>८. वाहन आढाव्यान्वये मंजूर वाहन संख्येप्रमाणे शासकीय मालकीची व करार पद्धतीने भाडेतत्वावर घेण्यात येणाऱ्या वाहनांची नोंद ठेवण्याची व दोन्ही प्रकारची वाहने मिळून वाहन आढाव्यानुसार मंजूर वाहन संख्येहून अधिक वाहने वापरण्यात येणार नाहीत याची जबाबदारी राज्यकर आयुक्त, वस्तु व सेवा कर विभाग यांची असेल. |